GR-200407281447007001-1100

सामुहिक प्रोत्साहन योजनांतर्गत काही सुधारणा.

सामुहिक प्रोत्साहन योजना १९९३ च्या प्रोत्साहना संबंधात अर्ज सादर करण्यास विलंब झाल्यास दंडाची कारवाई.

सामुहिक प्रोत्साहन योजना १९७९, १९८३, १९८८ आणि १९९३ अंतर्गत पर्याय बदलाच्या अंमलाची तारीख ठरविण्यासंबंधी.

सामुहिक प्रोत्साहन योजना १९९३ अंतर्गत सर्व आयात केलेल्या जुन्या यंत्रसामुग्रीच्या पात्रतेबाबत.

विक्रीकरातील झालेल्या बदलामुळे प्रोत्साहन योजनेंतर्गत उपलब्ध असलेले फायदे पूर्णत्वाने मिळण्यासाठी द्यावयाची मुदत वाढ.

सामुहिक प्रोत्साहन योजना १९९३ अंतर्गत विशाल प्रकल्प (मेगा प्रोजेक्ट) असा एक संवर्ग.

**महाराष्ट्र शासन,**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक - आयडीएल-१०९५/(१००१२)/उ-८,**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ३ जानेवारी, १९९६.

वाचा :

१) शासन निर्णय, उद्योग व कामगार विभाग, क्रमांक-आयडीएल-७०६४/उ-१, दिनांक २५ सप्टेंबर, १९६४,

२) शासन निर्णय, उद्योग व कामगार विभाग, क्रमांक-आयडीएल-७०६९/उ-१, दिनांक २ एप्रिल, १९६९,

३) शासन निर्णय, उद्योग व कामगार विभाग, क्रमांक-आयडीएल-७०६९/उ-१, दिनांक १० मार्च, १९७०,

४) शासन निर्णय, उद्योग व कामगार विभाग, क्रमांक-आयडीएल-७०७३/३४६०५/उ-१(ब), दिनांक २३ ऑक्टोबर, १९७३,

५) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक-आयडीएल-७०७६/६२१२(५)/उ-८, दिनांक १८ जानेवारी, १९७७,

६) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक-आयडीएल-७०७६/४८२८७(२९५)/उ-८, दिनांक १७ सप्टेंबर, १९७७,

७) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक-आयडीएल-७०७९/८११३३/(१९२५)/उ-८, दिनांक १८ ऑक्टोबर, १९७९,

८) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक-आयडीएल-७०७९/(२०४३)/उ-८, दिनांक ५ जानेवारी, १९८०,

९) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक-आयडीएल-७०७९/९५२२७(२५४०)/उ-८, दिनांक ११ ऑगष्ट, १९८०,

१०) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक-आयडीएल-७०८२/(३५५९)/उ-८, दिनांक ५ जुलै, १९८२,

११) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक-आयडीएल-१०८२/(४०९६)/उ-८, दिनांक ३१ मार्च, १९८३,

१२) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक-आयडीएल-१०८२/(४०७७)/उ-८, दिनांक ४ मे, १९८३,

१३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक-आयडीएल-१०८८/(६६१२)/उ-८, दिनांक २५ मार्च, १९८८,

१४) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक-आयडीएल-१०८७/(६२४५)/उ-८, दिनांक २१ जुलै, १९८८,

१५) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक-आयडीएल-१०८८/(६६०३)/उ-८, दिनांक ३० सप्टेंबर, १९८८,

१६) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक-आयडीसी-२१८८/(११३२४)/उ-१४, दिनांक ८ नोव्हेंबर, १९८८,

१७) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक-आयडीएल-१०८८/(७०१८)/उ-८, दिनांक ३१ जानेवारी, १९८९,

१८) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक-आयडीएल-१०८८/७०५६/उ-८, दिनांक २२ फेब्रुवारी, १९८९,

१९) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक-आयडीएल-१०९३/(८८८९)/उ-८, दिनांक ७ मे, १९९३, आणि

२०) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक-आयडीएल-१०९३/(९३७८)/उ-८, दिनांक ६ जुलै, १९९४.

प्रस्तावना :-

सामुहिक प्रोत्साहन योजना १९९३ ही दिनांक १ ऑक्टोबर, १९९३ पासून अंमलात आल्यानंतर उद्योग विभागाकडे काही औद्योगिक संघटना तसेच उद्योजकांकडून योजनेतील तरतुदीसंबंधांत उपस्थित झालेल्या अडचणींबाबत निवेदने सादर झाली होती. तसेच विविध सभांमध्ये याबाबत सूचना सादर करण्यात आल्या होत्या. यापैकी काही अडचणींचा विचार सहानुभूतीपूर्वक व्हावा असे उद्योग विभागाला वाटले आणि त्यानुसार उद्योग विभागाने सखोल तपासणी करुन असा निष्कर्ष काढला की, संबंधीत अडचणीं दूर करणे हे शासनाच्या धोरणाशी सुसंगत राहिल आणि योजनेतील तरतुदींचा पात्र उद्योग घटकांना योग्य त्या प्रमाणात व योग्य त्या प्रकारे फायदा मिळेल.

२. सामुहिक प्रोत्साहन योजना १९९३ अंतर्गत काही उद्योग प्रवर्ग पात्रतेसाठी प्रकल्प क्षेत्रानुसार आणि एकूण स्थिरमत्तेच्या गुंतवणूकीच्या आकारानुसार निर्दिष्ट करण्यात आले आहेत. यापैकी मुख्य प्रवर्ग म्हणजेच आद्य प्रवर्तक आणि प्रतिष्ठित प्रकल्प ज्यांना योजनेच्या अंतर्गत जास्तीत जास्त प्रमाणात फायदे उपलब्ध आहेत. मात्र केवळ गडचिरोली जिल्ह्यामध्ये किमान रु. १०० कोटीची गुंतवणूक करणारा उद्योग घटकच प्रतिष्ठित उद्योग प्रकल्प समजला जाईल आणि अशा उद्योग घटकास योजने अंतर्गत स्थिरमत्तेच्या १३० टक्के आणि २० वर्षाच्या कालावधीसाठी प्रोत्साहने उपलब्ध आहेत.

३. केंद्र शासनाच्या खुल्या धोरणामुळे देशातील तसेच परदेशातील उद्योजक हे फार मोठया प्रमाणावर गुंतवणूक असणारे उद्योग घटक स्थापन करण्यास उत्सुक आहेत. अशा प्रकल्पांमुळे राज्यातील एकूण औद्योगिकरणाला अतिशय जलद चालना मिळेल अशी अपेक्षा आहे. तसेंच इतरहि पूरक उद्योग आणि त्यांना अनुषंगिक असे बरेच उद्योगधंदे स्थापित होऊ शकतील आणि याचा फायदा राज्यातील आर्थिक विकासाला मिळेल अशी अपेक्षा आहे. या सर्वांचा विचार करता एक विशेष संवर्ग १९९३ योजने अंतर्गत विचारात घ्यावा की ज्यास काही खास सवलती दिल्या जातील. यासाठी स्थिरमत्तेत किमान रु. १००० कोटीपेक्षा जास्त

गुंतवणूक करणाऱ्या प्रकल्पास विशाल (मेगा प्रोजेक्ट) संबोधण्यात यावे आणि अशा विशाल प्रकल्पासाठी खास सवलती शासनाच्या विचाराधीन होत्या.

**शासन निर्णय :-**

शासनाने असा निर्णय घेतला आहे की :-

(१) १९९३ च्या योजनेखालील पात्रतेसाठी संबंधित अर्ज उत्पादन सुरु होण्याच्या ३ महिन्यापूर्वी सादर न झाल्यास जितका विलंब होईल तितका कालावधी एकूण पात्रतेच्या कालावधीमधून कमी करण्यात यावा आणि त्यांच्या एकूण आर्थिक मर्यादेमध्ये प्रमाणित कपात करण्यात यावी. (कलम क्रमांक-४.१(४))

(उदाहरणार्थ, अपेक्षित अर्ज हा ३ महिन्यापूर्वी सादर होण्या ऐवजी केवळ १ महिन्यापूर्वी झाल्यास त्याने २ महिन्याचा विलंब केला असे गृहीत धरले जाईल आणि पात्र कालावधी हा समजा ९ वर्षाचा असल्यास सदर पात्र घटक केवळ ८ वर्ष १० महिन्यासाठीच ग्राह्य धरला जाईल आणि स्थिरमत्तेच्या प्रमाणात आर्थिक मर्यादा समजा ९० टक्के असेल तर ती वरील कपातीनुसार ८८.३३ टक्केच निर्धारित केली जाईल).

(२) पर्याय बदल हा पात्रतेच्या कालावधी दरम्यान केव्हाही आणि कितीहि वेळा करता येत होता. मात्र आता सदर बदल हा केवळ एकदाच आणि त्यास अभिकर्त्याने मान्यता दिल्यानंतर ज्या महिन्यात मान्यता दिली असेल, त्याच्या लगेचच्या पुढच्या महिन्याच्या १ तारखेपासून अंमलात आणण्यात येईल. (कलम ५.१ (III)(2))

(३) १९९३ योजनेच्या कलम ३.८ (I)(ii) खालील स्पष्टीकरणांत खालीलप्रमाणे बदल वाचावा —

<u>स्पष्टीकरण —</u>

प्रोत्साहनासाठी आयात केलेली सर्व जुनी यंत्रसामुग्री, त्याचा उर्वरित काल किमान १० वर्षाचा आहे असे मूल्यांकन करणाऱ्याने प्रमाणित केल्यास, पात्र समजली जाईल.

(४) यापूर्वी निर्गमित झालेल्या पात्रता प्रमाणपत्राच्या कालावधी दरम्यान ज्या घटकांनी स्थगिती हा पर्याय निवडला आहे त्यांना उर्वरित कालाच्या १/५ इतका कालावधी वाढवून देण्यात येईल. अशाप्रकारे मूळ कालावधीत बदल करुन आवश्यक त्याप्रमाणे संबंधीत अभिकर्ता पात्रता प्रमाणपत्र बदलून देतील. याबाबत पात्र उद्योग घटकाने अभिकर्त्याकडे त्या अर्थाने निवेदन देणे आवश्यक राहील.

५. (अ) राज्यातील ब, क, ड, ड+ या क्षेत्रामध्ये स्थिरमत्तेत किमान रु. १००० कोटीपेक्षा जास्त गुंतवणूक करणारा प्रकल्प हा विशाल प्रकल्प (मेगा प्रोजेक्ट) संबोधीला जाईल.

(ब) रु. १००० कोटी ते रु.२००० कोटी गुंतवणूकीच्या मेगा प्रकल्पांना पात्रतेचा कालावधी १७ वर्षांचा असेल.

(क) रु.२००० कोटी पेक्षा जास्त गुंतवणूकीच्या मेगा प्रकल्पाबाबत पात्रतेचा कालावधी २० वर्षांचा असेल.

हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाचा अनौपचारिक संदर्भ क.पीएस/८०७८/ दिनांक ३० डिसेंबर, १९९५ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(मा. द. सरवणकर)
शासनाचे अवर सचिव

प्रति :

महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई (५ प्रती) यांना विनंती करण्यात येते की, या शासन निर्णयाबाबत आवश्यक ते वृत्तपत्र निवेदन देण्यात यावे, तसेच या निर्णयास पुरेशी प्रसिध्दी मिळण्याच्या दृष्टीने या शासन निर्णयातील मुद्यांना सर्व अग्रेसर वर्तमान पत्रात तसेच स्थानिक व ग्रामीण वृत्तपत्रांमध्ये (महाराष्ट्रातील) प्रसिध्दी देण्यात यावी.